# आपट्याची पानें

( कवितासंग्रह )

गोपाळ लक्ष्मण आपटे

प्रस्तावना लेखक

प्रो. श्रीपाद महादेव माटे, एम्. ए.

किंमत १२ आणे ] [ प्रकाशन १ जुलै १९३७.

आईच्या

( श्री. आनंदीबाई आपटे )

पवित्र चरणीं

**समर्पण**

# कवीचें हृद्गत

कांहीं दिवसांपूर्वी मी माझ्या मित्रांना, 'ध्यानांत ठेव, नाहीं-तर कविता करीन' 'लक्षांत धर, नाहींतर कविता वाचून दाखवीन' अशा धमक्या देत असे. त्यामुळें सहसा कोणी माझ्या वाटेस जात नसे. पण आतां माझे मित्र रा. यशवंतराव जोशी यांनीं हीं 'आपट्याचीं पानें' वाचकांच्या पुढें मांडण्याचें साहस केल्यामुळें, मी यापुढें आणखी कविता करतों कीं काय अशी मला स्वतःबद्दलच काळजी वाटूं लागली आहे! गुरुवर्य रा. बापूसाहेब माटे यांनीं सडेतोड पण गोड प्रस्तावना लिहून मला खरोखरच उपकृत केलें आहे. तसेंच माझे हौशी मित्र रा. रा. द. ब्रह्मे यांच्या मदतीबद्दलही मी फार आभारी आहे. रसिक वाचकांनीं मनमोकळेपणानें पुढील 'आपट्यांच्या पानांचा' परामर्ष घ्यावा अशी इच्छा आहे.

भ्रमर मण्डळ<br>
पुणें २.

गो. ल. आपटे

# प्रास्ताविक

प्रस्तावनेपैकीं जो भाग थोडासा अप्रिय वाटण्याचा संभव आहे तो प्रथम घेतों. कवितेंत वृत्ताच्या सोयीसाठीं ऱ्हस्वदीर्घांची ओढाताण केली तरी चालते. कारण पुष्कळ दिवसांच्या वहिवाटीनें तें मान्य झालेलें आहे. जो कवि ही ओढाताण करीत नाहीं त्याला जास्त मान मिळतो; पण जो ही करतो त्यालाही कोणी दूर सारीत नाहीं. तथापि जो ऱ्हस्वदीर्घांची ओढाताण करतो तो एक गोष्ट मान्य करतो असें दिसतें. "अमूक ठिकाणीं दीर्घ अक्षर हवें आहे; आपल्या शद्बांतील मूळचें अक्षर ऱ्हस्व आहे व म्हणून वृत्ताच्या सोयीसाठीं तें दीर्घ करून घ्यावयास हवें. आतां मूळचें ऱ्हस्व अक्षर मुद्दामच दीर्घ करून पुढें ओढलें तर थोडेसें वाईट दिसतें पण वृत्तरचनेस अनुसरून तेवढें करावयास हवें." हा नियम कवीनें ओळखला व मान्य केला एवढें त्यावरून खास दिसतें. प्रस्तुतच्या कवितासंग्रहांत मात्र रा. आपटे यांनीं याही गोष्टीची क्षिति बाळगिली नाहीं. त्यांना हे नियम माहीत नाहींत असें म्हणतां येण्यासारखें नाहीं. बरें, स्वातंत्र्य हवें म्हणून त्यांनीं या बाबीकडे दुर्लक्ष केलें असें म्हणावें तर आपल्याच कवितेची रसहानि त्यांच्या हातून झाली असें म्हणावें लागेल. तें कांहींही असो. या हयगयीमुळें, कविता वाचतांना कानाला त्रास देणारीं कित्येक स्थळें आढळतात. त्यांची यादी पुढें दिली आहे. मूळचा पाठ देऊन त्याच्यापुढें दुरुस्तीही सुचविलेली आहे. अक्षरें लघु असणें किंवा गुरु असणें व त्यांची संख्या वृत्तानुसार अमुक एक असणें या गोष्टीला फार महत्त्व आहे; पण आपटे यांनीं तिकडे काणाडोळा केलेला असल्यामुळें कवितेची रसहानि कशी झाली

आहे हें त्यावरून सहज ध्यानांत येईल. इतरही दोन तीन दुरुस्त्या केल्या आहेत.

पान २

मूळ—वांकून जों डोकवी त्या जलांत
दुरुस्तः—वांकून जों डोकवि त्या जलांत

पान ३

मूळः—देशासाठिंच हाय ! सात वर्षें कारागृहीं काढलीं !
दुरुस्तः—देशासाठिंच हाय ! सात वरुषें कारागृहीं काढलीं !

पान ६

मूळः—आणि सारंगी मंजूळ छेडण्याला ! !
दुरुस्तः—आणि सारंगी मंजु छेडण्याला ! !

किंवा

आणि वीणा मंजूळ छेडण्याला ! !

मूळः—पहा आतांही गातसे गोड गीत
दुरुस्तः—पहा आतांही गात गोड गीत
मूळः—किरण गाली होता तिथून आला ! :
दुरुस्तः—किरण होता तेथून गालिं आला ! !

पान ७

मूळः—अन् पदव्या फुटकें नशीब म्हणुनी, तो दीन गुंडाळतो !
दुरुस्तः—अन् पद्व्या फुटकें नशीब म्हणुनी, तो दीन गुंडाळतो !

पान १०

मूळः—दुःख आणि सौख्यही सारखेंच
दुरुस्तः—दुःख आणी सौख्यही सारखेंच
मूळः—मूर्त बघुनी गाढवा ! तव प्रशान्त
दुरुस्तः—मूर्त बघुनी गाढवा ! तव सुशान्त

पान १२

मूळः—सकाळीं दुपारी, आणी सांजकाळीं
दुरुस्तः—सकाळीं, दुपारीं अणी सांजकाळीं

पान १५

मूळः—होती कोंवळि कांकडी, परि आतां झाला कडू भोंपळा !

दुरुस्तः—होती कोवळि कांकडी परि अतां झाला कडू भोंपळा !

पान १६

मूळः—तरी पर्वा नाहीं मुळीं तयाला !

दुरुस्तः—तरी पर्वा नाहींच मुळीं त्याला

पान २०

मूळः—तें कांहींहि असो, परि प्रभुवरा, कुर्यात् सदा मंगलम्

दुरुस्तः—तें कांहींहि असो, परि प्रभु तुझें कुर्यात् सदा मंगलम्

मूळः—सारी दंगल माजली, प्रभुवरा कुर्यात् सदा मंगलम्

दुरुस्तः—सारी दंगल माजलि, प्रभु तुझें कुर्यात् सदा मंगलम्

पान २७

मूळः—हिरा आकाशीं बेभान धांवणारा

दुरुस्तः—हिरा व्योमीं बेभान धांवणारा

मूळः—येत कानीं कोकिलेची लकेरी

दुरुस्तः—येत कानीं कूकूहु कोकिळेची

पान २९

मूळः—मोठे मोठे स्तविति तुजला राजदरबारिं लोक

दुरुस्तः—मोठे मोठे स्तविति तुजला राजदर्बारिं लोक

पान ३२

मूळः—प्रेम कोणिही करेना

दुरुस्तः—प्रेम कोणिही करीना

पान ३३

मूळः—प्रेम कोणीही करेना

दुरुस्तः—प्रेम कोणिही करीना

पान ३६

मूळः—स्फूर्ती झणीं सु-कविची आटली क्षणांत

दुरुस्तः—स्फूर्ती झणीं सु-कविची अटली क्षणांत

पान ३९

मूळः—बंद बंडीचे फाटलेच होते.

दुरुस्तः—बाहु बंडीचे फाटलेच होते.

किंवा

बंद बंडीचे तूटलेच होते.

पान ४१

मूळः—होतें धोतर फार पातळ जणूं मावेल चिमटीमधें

दुरुस्तः—होतं धोतर फार पातळ जणूं मावेल चिमूटीमधें

मूळः—होता त्यांतुनि तो कवी ! गदगदे स्फूर्ति तयाची क्षणीं

दुरुस्तः—होता त्यांतुनि तो कवी ! गदगदे स्फूर्ती तयाची क्षणीं

पान ४२

मूळः—पत्र घेवोनी माडीवरी निघाली !

दुरुस्तः—पत्र घेवोनी माडिवरि निघाली !

मूळः—नसे कां हो भाऊ तिचा वडील ?

दुरुस्तः—नसे कां हो तो भाउ तिज वडील ?

पान ४३

मूळः—हातिं भाऊच्या देवोनि पत्र बाला

दुरुस्तः—हातिं त्याच्या देवोनि पत्र बाला

मूळः—' आइ ! रडतो भाऊ ! असें म्हणाली

दुरुस्तः—' आई ! रडतो बघ भाउ ! ती म्हणाली

मूळः—धांव घेई माडीवरी बिचारी

दुरुस्तः—धांव घेई ती माडिवरि बिचारी

मूळः—' टाक माईचें कुंकु आतां पुसुन '

दुरुस्तः—' टाक माईचें कुंकु बघ पुसून '

पान ४४

मूळः—तंबाखू चघळूं नको, ताशि कधीं तपकीर ओढूं नको

दुरुस्तः—तंबाखू चघळूं नको, ताशि कधीं तपूकीर ओढूं नको

पान ४५

मूळः—स्तुती कोणी वाटेल ती करोत

दुरुस्तः—स्तुती कोणी वाटेल ती वदोत

मूळः—गिधाडेंही फाडोत शरीराला !

दुरुस्तः—गिधाडें वा फाडोत शरीराला !

रा. आपटे यांनीं आपल्याच नांवावर कोटि करून या पुस्तकाचें नांव 'आपट्याचीं पानें' असें ठेविलें आहे. ही दर्शनी कोटी पहातांच या पुस्तकांत विनोदी कविता असतील अशी कल्पना आपोआप होते; व कविता वाचून झाल्यावर आपली कल्पना बव्हंशीं बरोबर होती असें दिसून येतें. या संबंध कवितेवर बालपणाची एक सूक्ष्म छाया पसरलेली दिसते, व त्या बालपणांतील जे दोन मुख्य विकार म्हणजे रडणें आणि हंसणें ते कमी अधिक ठळकपणानें सर्वत्र दिसतात. त्यांतल्यात्यांत रडणें म्हणजे शोक थोडा कमी आहे व हंसणें म्हणजे विनोद हा त्यांतल्यात्यांत जास्त आहे. म्हणून एकंदर कविता विनोदी आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. आपटे यांच्या विनोदाचें ठोकळ लक्षण म्हणजे चालू प्रसंगाचें जें मुख्य व परिस्थितिविशेषास अनुरूप असें रूप असेल त्याच्या पोटांत वावरत असलेला सूक्ष्म व क्षुद्र असा जो विरोध तो दाखविणें हें होय. सर्व लोकांचें लक्ष एकाद्या प्रसंगाच्या विधायक रूपाकडे असतें. पण एकाद्याचें त्याच्या अंगभूत असलेल्या बारक्याशा असंगतीकडेच असतें. आणि म्हणून इतर सर्व लोक जरी त्या प्रसंगाकडे गांभीर्यानेंच पहात असले तरी याला मात्र मनांतल्या मनांत कां होईना पण अतिशय हंसू येतें. आपटे यांच्या कवितेंत हें त्यांच्या मनांतलें हंसणें ठिकठिकाणी व्यक्त झालें आहे.

मी लहान असतांना मला माझी आई एकदां रागें भरली. होती कारण कीं, आमच्या शेजारचा एक पोक्त गृहस्थ डब्यांत तांदूळ

भरत असतांना आणि इतरही सर्व मंडळी त्याच कामांत गुंतली असतांना मी मात्र अगदीं वाकडातिकडा होऊन हंसत होतों. आमच्या व या शेजाऱ्याच्या घरीं तांदूळ घेतले होते, व ते लहान तोंडाच्या डब्यांत भरण्याचें काम चालू होतें आम्ही मुलें मुलें मात्र नुसतींच उभीं होतों, इतर सर्व लोक ओंजळी भरून डब्यांत ओतीत होतीं. पण वरचा जो पोक्त माणूस त्यानें एक निराळीच कल्पना योजिली. त्यानें एक लहानशी सुपली घेऊन ती तांदुळांच्या ढिगांतून भरून काढिली व तिच्यांतील तांदूळ तो डब्यांत ओतूं लागला. पण सुपलीची धार मोठी पडूं लागली म्हणून त्यानें दोनही हातांनीं सुपलीचा विस्तार एका टोकाकडे वांकविला. अर्थात् त्यामुळें धार बारिक होऊन डब्यांत पडूं लागली. आतां हें सर्व योग्य असेंच होत होतें. पण सुपलीचें टोंक त्यानें जों जों जास्त वांकवावें तों तों त्या गृहस्थाचा खालचा ओंठ सुपलीच्या आकाराचा होऊन तिरकसपणें लोंबूं लागला. बाकीचे लोक अर्थात् तांदूळ भरण्यांतच गर्क होते. पण आमचें लक्ष त्याच्या त्या निमुळत्या ओंठाकडे गेलें. जों जों सुपलीतले तांदूळ संपत आले तों तों ओंठांची अगदीं दूण होऊन गेली. अर्थात् ही शारीरिक विकृति पाहून मला अनावर हंसूं आलें. पण सगळीं माणसें कामांत गुतलीं असतांना मी मात्र हंसलों हें पाहून मला आई रागें भरली. जो एक चालूं विधायक प्रसंग असतो त्याला अंगभूत म्हणून एकादी सूक्ष्म पण क्षुद्र विकृति असते व तीमुळें आपणांस हंसूं येतें असें जें वर म्हटलें आहे तें कसें हें यावरून दिसेल.

रा. आपटे यांनीं 'देवाचीये द्वारीं' या नांवाची एक कविता लिहिलेली आहे. ती अशी:—देवाचिये द्वारीं उभा क्षण-भरी। नजर गहिरी रोंखूंनिया॥ हात जोडियेले नयन मीटले।

आणि मग हाले, तेथोनिया ।। हळूंच पायांत वहाणा घालोनी । त्वरेनें निघोनी चाललासे ।। अनवाणी होता येतांना बिचारा । देवावरी सारा भार त्याचा ।। या कवितेत अगदीं थोड्याशा मर्यादेंत रा. आपटे यांनीं खूपच विनोद उत्पन्न केलेला आहे. एवढा थोरला विनोदाचा उद्-भव होण्याला दुसऱ्या एकाद्या कवीच्या हातून पुष्कळच मजकूर खर्ची पडला असता; त्यानें कांहीं कथानक रचलें असतें, त्याचें विकसन केलें असतें, रसपोषासाठीं ओवतीं भोवतीं एकादी मेहरप उभी केली असती आणि मग त्यांतून हा विनोदाचा उद्भव झाला असता. पण आपटे यांनीं अगदीं थोड्याशा रचनाकौशल्यानें हा विनोद साधला आहे. पण आपलें प्रस्तुत निराळें आहे. वर जी एका पोक्त गृहस्थाची गोष्ट दिली आहे तिच्यांतल्या सारखाच कांहींसा प्रकार येथें आहे. वास्तविक पहातां कवितेतला मूळचा प्रसंग, विधायक रूपानें पहातां, खरोखरी गंभीर असाच आहे. एकाद्या गंभीर प्रवृत्तीच्या कवीनें देवाच्या द्वारीं उभा असलेला भक्त पाहिला असता तर त्यानें आपल्या कवितेंत कांहीं निराळेंच लिहिणें लिहिलें असते. पन्नास कोस जमीन चालत येऊन हा पांडु-रंग–माउलीचा भक्त दर्शनसुखाची ढेकर देत दारांत उभा आहे. असेंच त्यानें म्हटलें असतें. गळ्यांत तुळशीची माळ, अंगांत वाटेच्या धुळीनें मळून गेलेली खादीची बंडी, ऊन लागूं नये म्हणून दुहेरी धोतराचें रुमालाच्या भोंवतीं कानावरून दिलेले तिढे, भाळीं भरलेला बुक्याचा मळवट, हातांत विठ्ठलाची पताका, तोंडीं हरिनामाचा गजर' असा हा वारकरी भक्त दर्शनसुखानें रोमांचित होऊन देवाच्या द्वारीं उभा आहे; भोंवतालीं त्याच्या सारखेंच शेंकडों भजनी उभे असून विठ्ठल–नामाचा वर्षाव होत आहे; सर्व चंद्रभागेच्या वाळवंटभर वारकऱ्यांचे थवे आनंदानें

डुलत नाचत आहेत; हर तऱ्हेचा भेदभाव विसरून हे सर्व वैष्णव एकमेकांच्या चरणांवर डोई ठेवीत आहेत आणि असा हा आपल्या भक्तांनीं चालविलेला प्रेमसोहळा श्रीविठ्ठलरखुमाई कमरेवर हात ठेवून निश्चल मनानें पहात आहेत; असा कांहीं वर्णनाचा थाट, प्रसंगाचें विधायक रूप ज्याच्या मनांत भरलेला आहे अशा एकाद्या कवीनें मांडिला असता.

दुसऱ्या एकाद्यानें एकादी निराळीच कल्पना कवितेंत आणिली असती. हा 'देवाचिये द्वारीं' उभा असलेला भक्त, दर्शनाचें सुख संपादून त्याची ढेकर देणारा नव्हे, तर ज्या विठ्ठलाचें नांव आपण जन्मभर घोकत आहों आणि ज्याच्या नांवें टाळ्या पिटत आलों त्याचें खरोखरीचें दर्शन एकदां तरी होईल काय अशी भूक मनांत बाळगणारा कोणी दुर्भागी अस्पृष्ट आहे अशी कल्पना त्यानें केली असती. ज्याच्या भक्तीचें माप इतर वैष्णवांनी पाहिलें पण ज्याला पदरांत घेतलें नाहीं, प्रवासाच्या दगदगीनें आणि वाटच्या तोटक्या शिदोरीनें ज्याचें पोट भकाटीस गेलें आहे, दीर्घ श्वासामुळें ज्याच्या बरगड्या नळनळत आहेत, शतजीर्ण झालेल्या पागोट्याच्या शेंकडों पट्ट्या एकत्र रचून ज्यानें त्या एकाच विळख्यानें डोक्यास आंवळून टाकिल्या आहेत, ज्याच्या मिशांवर आणि दातांवर प्रवासाचें किटण चढलेलें आहे, "दूर हो, दूर हो" असे नेहमींच कानीं पडलेलें असल्यामुळें जो आपण होउनच येथें अंग चोरीत आहे, 'पांडुरंगाऽ' म्हणतांना ज्याच्या आवाजांत आशा, निराशा आणि तक्रार यांचा चमत्कारिक मिलाफ झालेला आहे, अशा एकाद्या, सर्व भक्तकुलाला भूषणभूत झालेल्या महाराचेंच वर्णन त्याला सुचलें असतें. पण हा सर्व मनाच्या घटनेचा खेळ आहे. मूळ वस्तूला निरनिराळीं रूपें कल्पितां येतात आणि आपल्या मनाची ठेवण जशी

असेल तशी कल्पना आपण करतों. एकाद्या प्रेमळ भक्तानें किंवा सामाजिक वैगुण्य ज्याच्या चित्तास उपद्रव देत आहे, त्यानें प्रस्तुतचा प्रसंग कसा वर्णिला असता हें सांगितलें. पण आपटे यांच्या बुद्धीला मनुष्यमात्राला सुपरिचित असलेलें असें एक निराळेंच वळण आहे, आणि म्हणून प्रस्तुत सारख्या प्रसंगांतही सूक्ष्म पण क्षुद्र विरोध कोठें आहे हें त्यांच्या ध्यानांत जलदीनें भरतें. वर जें तांदूळ भरतांना वाकड्या झालेल्या ओठाचें वर्णन आहे त्याच्या सारखाच हा प्रकार आहे. मुख्य प्रसंग गंभीर किंवा करुणास्पद असेल पण तो तसा असून सुद्धां त्याच्या पोटांत एक बारीक विरोध असण्याचा जो संभव त्याची प्रतीति आपटे यांच्या मनाला मोठी गंमतीची वाटली. गंभीर किंवा करुण वृत्तीच्या कवीला असें जोडाचोरीचे प्रकार देवाच्या दारांत होत असतील हें माहीत असतेंच व आपटे यांना सुद्धां एकादा मनुष्य जरी लोकांचा जोडा लांबवीत असला तरी मूळचा एकंदर प्रसंग गंभीर किंवा करुण-रस—प्लुत असेल हें माहीत आहेच. पण माणसाचें सामुदायिक मन श्रम विभागानें चालतें असें दिसतें. एकाच माणसाच्या वाट्याला मनाचे सर्व धर्म आलेले नसतात. कोणाच्या वाट्यास गांभीर्य आलेलें असतें, कोणाच्या वाट्यास कारुण्य आलेलें असतें, कोणाच्या वाट्यास विनोद आलेला असतो, कोणी उपहासांत गंमत मानतो. या सर्व निरनिराळ्या वृत्तींचें मिळून एक सामुदायिक मन तयार होत असतें; आणि म्हणून ज्याच्या वांटणीस गांभीर्य आलें त्यानें विनोदी माण-साला कमी मानतां उपयोगाचें नाहीं आणि विनोदी माणसानेंही त्या गंभीर माणसाला कायमचा सुतकी असें समजतां उपयोगाचें नाहीं; कारण, कोणी कितीही गंभीर असो त्याला मनाचें ओझें हलकें करण्या-साठीं विनोदाचा जुलाब घ्यावाच लागतो, व जो नेहमींच खुदु खुदु

हंसत आहे असें इतरांस वाटतें त्याला एकाद्या धीर गंभीर माणसाची वृत्ति पाहून आपल्या लघुत्वाची चोरटी जाणीव उत्पन्न होते. सबंध आठवडाभर हरतऱ्हेच्या गंभीर विषयांची आपल्या मनाशीं शहानिशा करणारे येथील एक पटाईत संपादक वाचनालयांत मुद्दाम जाऊन एका कोपऱ्यांत बसून विनोदी चुटके वाचून एकटेच पोट धरधरून हंसत बसतात हें पुष्कळांस माहीत आहे. तसेंच सगळ्या गांवावर हास्यरसाचा महापूर सोडणारे कै. गडकरी हे एकांताचे वेळीं अत्यंत गंभीर आणि कष्टी होऊन बसत हेंही पुष्कळांना माहीत आहे. जें कांहीं मुख्य म्हणून मनाच्या वाट्याला आलें असेल त्यांत इतर वृत्तींची अवश्य ती भर पडल्याशिवाय मनाला चैन पडत नाहीं. कारण स्वतःचें विकलांगपण त्याला सारखें बोंचत असतें. असा हा श्रमविभागाचा प्रकार आहे. कोणी तबला वाजवितो, कोणी सारंगी वाजवितो, कोणी पेटी वाजवितो, कोणी गाणें गातो—असे नाना प्रकारचे आवाज निघून त्यांच्या मिलाफानें मधुर संगीत जसें बनतें तसेंच मनाच्या सामुदायिक व्यापाराचें होय. या व्यापारापैकीं, ज्याच्याकडे इतर कोणाचें फारसें लक्ष जात नाहीं, त्या उपांगावर, हातीं असलेल्या विजेच्या दिव्याचा बारीक झोत पाडून, " ज्याला तुम्ही एवढें गौरवाचें आणि गंभीरपणाचें ठिकाण समजतां तेथें असाही एक गमतीचा प्रकार आहे हें ध्यानांत ठेवा." असें आपटे हे विनोदबुद्धीनें सांगतात. भरलेल्या पंक्तींतून ,हाड हाड म्हणतां म्हणतां एकादें कुत्रें जसें वाकडें तिकडें पळत सुटतें तसाच प्रकार आपल्या जीवितांतील सर्व प्रसंगांत होत असतो. या भोजन-प्रसंगाची हकीगत सांगण्याच्या वेळीं एकादा गृहस्थ तेथील टापटीप, व्यवस्था, वाढण्याची पद्धति, केलेले पदार्थ, मधून मधून झालेले श्लोक इत्यादिकांचें वर्णन करून ही हकीकत संपवूं लागला

तर त्याचा जो दुसरा धाकटा जोडीदार असेल तो त्याला डिवचून म्हणेल कीं, " कां हो, बाकीचें सगळे सांगितलेंत पण भांबावलेलें कुत्रें मधेंच शिरल्यामुळें पंगतींत जो खोकाळा माजला आणि वाढणाऱ्या बायका हातांतील ताटें टाकून ज्या सू पळाल्या त्याचें वर्णन करावयाचें अजून राहिलेंच आहे!" याचा अर्थ असा कीं त्याच्या मनांत हा उत्तरोक्त प्रसंगच जास्त भरला होता.

आपटे यांच्या मनाची ही लकब त्यांच्या सगळ्या काव्यांत दिसून येते; आणि मी जर त्यांचा समवयीन असतों तर पुस्तक वाचतांना मनाशीं म्हटलें असतें 'पोरगें मोठें मिस्किल आहे.' त्यांची 'कवि आणि चिखल' ही कविता पहा. कवितेला नांव सुद्धां विनोदाचेंच दिलेलें आहे. जे दोन पदार्थ एकत्र आणावयाचे त्यांच्यात कांहींतरी सारखेपणा असावयास हवा; जसें 'बोकड आणि लांडगा,' 'कासव आणि ससा,' 'संपादक व त्यांचे टीकाकार.' पण 'कवि आणि चिखल,' तसेंच 'मिशा आणि बासुंदी' इत्यादि मथळे काव्य वाचावयाच्या आधींच हंसू आणितात, आणि कविते- विषयीं कुतूहल उत्पन्न करितात. कवितेंतील विनोदामुळें मथळ्यांतील शब्दसंहीत अपवादास पात्र होत नाहीं. कारण ही संहति जाणून बुजून तशी बनविलेली असते. मागें एकदां एका वेड्या संपादकानें आपल्या अग्रलेखाच्या शीर्षकांत भलतेच दोन शब्द एकत्र आणलेले होते. त्यावर बोलतांना कै० काशिनाथ शास्त्री लेले यांनीं मोठी समर्पक टीका केली; व मथळ्यांतील मूर्खपणा ध्यानांत आणून द्यावयासाठीं म्हटलें कीं, " सध्यां स्वदेशी साखरेची चर्चा चालू असल्यामुळें उद्यां तुम्हीं 'बाळ गंगाधर टिळक आणि गूळ' असाही एकादा मथळा अग्रलेखाला घालाल!" तारतम्य बुद्धीनें अशा प्रकारच्या मथळ्यांतील अप्रयोजकपणा सहज ध्यानांत येतो.

पण आपटे यांनीं विनोदबुद्धीनें हे मथळे बनविलेले असल्यानें त्यांत अप्रयोजकपणाचा गंधही रहात नाहीं; इतकेंच नव्हे तर, कवितेच्या वाचनाला माणसांचे मन अगाऊच उल्हसित होऊन तत्पर बनतें. असो. हें मथळ्याचें बोलणें सोडून देऊन कवि आणि चिखल यांतील मिस्किलपणा पहावयास हवा. एकाद्या श्रृंगारप्रिय रंगेल कवीनें त्या तरुण नायकाची आणि नायिकेची दृष्टादृष्ट होऊन त्यांची मनें कशीं विद्ध झाली याचें वर्णन दिलें असतें; किंवा जीवितांत शोकाचे प्रसंग सौख्याच्या पुढें कसे वाढून ठेविलेले असतात हें मर्म त्याच्या बुद्धीस भिनलेले असलें तर त्या युवकाला मोटारनें कसा अपघात झाला, किंवा एतत्सम दुसरें कांहीं वर्णन केलें असतें. पण आपटे यांनीं या नटव्या, आणि भावी नायिकेच्या डोळ्यांत भरण्या-साठीं उत्सुक झालेल्या कोंवळ्या नायकाच्या अंगावर चिखल उडून त्याचा कसा विरस झाला आणि जिच्या समोरून आपण मोठ्या सौंदर्यसफाईनें निघून जाऊं असें त्यास वाटलें होतें, ती, ही चिखलाची पिचकारी पाहून कशी हसली याचें मात्र वर्णन केलें आहे. लहानसाच प्रसंग पण चांगला खुलवीत आणून शेवटीं त्याचें पर्यवसान, पोकळडौली नायकाच्या पाणउताऱ्यानें आणि रूपहानीनें कसें झालें आहे, हें फार सुंदर रीतीनें त्यांनीं दाखविलें आहे.

आपल्या बरोबरीच्या स्नेह्यांचीं लग्नें होऊं लागलीं म्हणजे ज्यांना निदान वृत्तरचना करतां येते ते " कुर्यात् सदा मंगलम् " या पालुपदाची कविता करून मंगलाष्टकाच्या ऐवजीं ती म्हणतात; किंवा निदान ती नवऱ्या मुलांस अर्पण करून विड्यास आलेल्या शेकडों गृहस्थांच्या हातांत ही एक कागदाची नवी अडगळ देत असतात. रा. आपटे यांना आपल्या एका मित्राला अशीच अर्पणपत्रिका द्यावयाची आहे; पण या रूढ पत्रिकेंत आणि आपटे यांनीं लिहिलेल्या पत्रिकेंत केवढें

अंतर आहे पहा. आपला मित्र कसा का वेडा–बागडा असेना पण तो प्रसंग गंभीर असल्यामुळें या नेहमींच्या अर्पणपत्रिका ठराविक सांचाच्या होतात. आतां जीविताचें नवें तबक चालू होत आहे, नवी जबाबदारी येऊन पडत आहे, स्त्रीपुरुषांच्या जोडीनेंच जगताचे व्यापार चालत असतात, तुमचे घर धनधान्यानें भरावें, इंद्र आणि इंद्राणी सारखें तुम्ही सुखी असावें, असें कांहींतरी, पण प्रसंगाच्या गांभीर्यास मात्र युक्त असें हे हौशी कवि लिहीत असतात. पण वर उल्लेखिल्या प्रमाणें या इंद्र-इंद्राणीची खरी किंमत काय आहे हें रा. आपटे यांना माहीत असल्यामुळें प्रसंगाचा तोंडदेखला डौल बाजूस सारून त्यांची विनोदबुद्धि गैरसोयींचें वाटणाऱ्या वास्तव ज्ञानाला जाऊन झटते. आणि म्हणून त्यांनीं त्या नवरदेवाला अगदीं त्याच्या रुपड्याची कल्पना त्याला देऊन खरें खुरें "कुर्यात् सदा मंगलम्" लिहिलें आहे. किती तरी नवरदेव असे असतात कीं ज्यांना आपटे यांनीं केलेलें वर्णन अक्षरशः लागू पडावे. असो. हें पुस्तक लहान आहे तरींही त्यांतील प्रत्येक कवितेचा परामर्ष घेणें अशक्य आहे. रा.आपटे यांच्या मनाचा कल कसा आहे आणि आपल्या विनोदबुद्धीचा आविष्कार ते कसा करतात याचें जें स्पष्टीकरण वर केलें आहे तें पुरेसें आहे असें वाटतें. विनोद यां विषयावर विवेचन करणें हें एथें अर्थातच संकल्पिलेलें नाहीं; तर प्रस्तुत कविता–संग्रहांत जो विनोद आहे त्याचें स्वरूप काय हें पहाण्याचेंच काय तें आपलें काम होतें. विनोद करूं घातला आहे आणि तो फसला आहे असें सहसा कोठेंच झालेलें नाहीं. इतकेंच कीं, एकाद्या कवितेत तो रस कमी साधला आहे, दुसऱ्या एकादींत तो फारच उत्कट असा दिसतो. सरसकट सर्व कविता अत्यंत आल्हाददायक वाटतात. या विनोद–निर्मितीला जर

सफाईची जोड नसती तर वाचकाला तीं तीं विनोदस्थळें कळावयास कष्ट पडले असते आणि मग विनोद असून सुद्धां त्यांतील स्वारस्य नष्ट झालें असतें. पण आपटे यांची रचना खरोखरच फार सफाईदार आहे. त्यामुळें वाचतांक्षणींच पूर्ण अर्थबोध होऊन विनोदाचें सुख अनुभवावयास सांपडतें. ' साभार परत ' ' अशिलास ' ' तेव्हां आणि आतां ' ' एकद्याचें नशीब ' ' कवि आणि चिखल ' इत्यादि कविता वाचून पाहिल्यास आपटे यांच्या कवितेच्या प्रासादिकपणाची चांगली कल्पना येईल. ' वळू ' ' शंकर आणि नंदी ' ' वा रे बंड्या ' ' गवळी आणि पाऊस ' या कविता वाचल्या म्हणजे आपटे यांच्या विनोदबुद्धीला उत्तरोत्तर निरनिराळे अंकुर फुटूं लागतील हें स्पष्ट दिसतें.

कवींनींच कवींची चेष्टा करावयाची हा एक नवीनच प्रकार कवितेंत शिरला आहे. केवळ काव्यतत्त्वाविषयीं ही जर गद्यांत कांहीं अनुकूल-प्रतिकूल लिहिलें तर ते कवींना खपत नाहीं; पण पद्यांत कवींची कशीही चेष्टा केलेली असली तरी ती चालते असें दिसतें. बापड्या गद्यावरच्या रागाचें हें आणखी एक प्रदर्शनच आहे. आपले विनोदी मित्र रा. अत्रे यांनीं सबंध नाटकभर कवींची केवळ रेवडी उडवलेली आहे पण ती पाहूनही कवींना रुसावयास फुरसत झाली नाहीं. पण त्यामुळें कवींनींच कवींची थट्टा करायची ही प्रथा व पडत जात आहे असें दिसते. म्हणून रा. आपटे यांच्यावर कवींनीं थोडें तरी रागवावें असें माझें मत आहे. रा आपटे यांनीं येवढ्याशा कविता—संग्रहांत पांच सहा कवितांत कवींचा अगदींच पाणउतारा केलेला आहे. " एकादा फुटकें नशीब म्हणुनी येथें कवी होतसे "; " स्फूर्ती झणीं सुकविची अटली क्षणांत । गद्दा करूनि कविता करि भस्मसात ॥ "; " अन् सारे चिखलामधें सुकविचें

सर्वांग तें रंगलें। अन् बाला हसुनी तशीच पुढती गेली निघोनी त्वरें ॥"; "बाळ्या हाय! पहा अखेरिस परी काव्यें करूं लागला" "देवराया प्रार्थना या जिवाची, नको कविता मजवरी रे कुणाची" याहून कवि लोकांची अधिक खुमारीदार टर उडविणें जर शक्य व अवश्य असले तर तें केवळ रा. अत्रे यांनाच आहे. असो. पण यांतही आपण असेंच मानून चालावयास हवें कीं ही सर्व टीका वाईट कवीं-वर असली पाहिजे. विनोदाचा हाही एक प्रकार संपल्यानंतर आपटे यांच्या कवितेत जे थोडे इतर रस आहेत त्यांचाही परामर्ष घ्यावयास हवा. 'भगवा झेंडा' 'अतां काय त्यांचें' 'पुण्याची पर्वती' 'अस्त-प्राय निशाण' अशा कांहीं देशाभिमानाच्या कविता त्यांनीं लिहिल्या आहेत; पण या कवितांचे विषय देशाभिमानाचे आहेत इतकेंच काय तें. देशाभिमानी कवितेंत जो एक स्फूर्तीचा भाग असतो त्याचा लेश ही आपटे यांच्या या कवितांत सांपडत नाहीं. आपल्या कवितेची ही बाजू विशेष विकसित करीत नेण्याची आपटे यांनीं खटपट करावी असें मला वाटत नाहीं. वर एके ठिकाणीं बालस्वभावां-तील रडणें व हंसणें या दोन विकारांचा उल्लेख केलेला आहे त्यापैकीं हसण्याची वृत्ति आपटे यांच्या मनांत जोरानें वृद्धि-गत होत आहे. इतकी कीं, सद्यःकालीन अत्यंत प्रगल्भ अशा विनोदी लेखकांशीं ते लवकरच स्पर्धा करूं लागतील अशी अटकळ करणें चुकीचे होणार नाहीं. तथापि या वृत्तीचा पोष जरी जोरानें होत असला तरी रडणें म्हणजे शोकाकुल वृत्ति हीहि त्यांच्या लिहिण्यांत मोठ्या नाजूकपणानें इकडे तिकडे लपत छपत हिंडतांना दिसते. 'मधुकरी' ही कविता रानडे यांच्या या विषयावरीलक विते-इतकी भरघोंस नसली तरी त्या प्राण्याच्या अनुकंपनीय स्थितीची जाणीव तिच्या वाचनानें सहज प्राप्त होतें 'नाम्याची आई' या

कवितेनें तर सहृदय माणसाचें हृदय भग्नच होईल. "Sands of the Dee या इंग्रजी कवितेचें आपटे यांनीं केलेलें रूपांतर असेंच हृदय-भेदक आहे. मात्र ' नशिबाचा नाच ' हें नांव त्या कवितेला चांगले दिसत नाहीं; असो. या कवितांचा आणखी एक विशेष उल्ले-खावयास हवा. तो म्हणजे कवितांचे छोटें आकारमान हा होय. एकादी दुसरी कविताच एका पानाहून जास्त लांबीची असेल. बाकीं सर्व अगदीं सुटसुटींत आणि लहानशा आहेत यानें दोन गोष्टी होतात. एक, वाचक चटाचट मोकळा होतो, आणि त्यांही-पेक्षां दुसरी म्हणजे दहा पांच ओळींत मूळ प्रसंग सांगून विनोदाची मोठी मधुर खुलावट या कवीला कशी करतां येते हेंहि दिसून येतें.

रा. यशवंत गोपाळ जोशी यांनीं ही ' आपट्यांची पानें ' ग्रंथ-प्रसिद्धिरूप शिलंगणाच्या आधीं माझ्या हातावर ठेविलीं आणि यांचें मोल काय तें सांगा असें मला विचारलें. याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. आपटे यांच्या कवितेला धरून जेवढें लिहिणें युक्त होतें तेवढें मी लिहिलें आहे.

—श्रीपाद महादेव माटे

स्वातंत्र्याच्या सर्वस्वाचें निशाण प्यारें असे
तें अतां दिसावें कसें ?

शिवरायाच्या जित्या जिवाचें वैभव तें जागतें
अहह ! तें दिसावें कुठें ?

स्वातंत्र्याच्या वाऱ्यावरचें सरतां तें फडकणें
जाहलें फुकाचें जिणें !

' भगवा झेंडा ' किती ठिकाणीं डौलानें नाचला !
तो अतां कुठें हरपला ?

माणिक मोत्यें किती जिवांचीं त्यासाठीं उधळलीं !
तीं निष्फळ परि जाहलीं !

' भगवा झेंडा ' स्वातंत्र्याची खूण असे आमची
ती कुठें दिसावी कशी ?

प्रणाम करती ' भगव्या झेंड्या ! ' तुजला हिंदू खरे
ते कशी गळ्या माजरे !

## अस्पृश्यता !! : : २

बारावरी एक जसा जहाला
व्याकूळ त्याचा मग प्राण झाला

हौदावरी जाउनि एकदांचे
पोहोंचले पाय बळेंच त्याचे

होता तृषेनें बहु पीडिलेला
पाणी बघोनी बहु तृप्त झाला

वांकून जों डोकवी त्या जलांत
तों गर्जना होय तिथें क्षणांत

धांवे कुणी धोतर आंवळून
बोले कुणी द्याच तया हकून

ठराव झाला मग तो पसार
हे-हिंदभूमे-तव पुत्र थोर !!

पाणी न लाभे लव त्यां तृषार्ता
अस्पृश्य तो कारण एक होता.

## फुलाची पांखरण : : १

### दशक

तारा कोसळुनी पडे सहजची अंधार हा माजला
गेलें फूल गळूनि तों सहजची हा बाग कोमेजला

पक्षी जाय म्हणूनि हाय! घरटें भेसूर तें जाहलें
गेलें बाळ म्हणूनि भीषण असें नैराश्य हें माजलें!!

देशाचे महशूर पुत्र, असली कीर्ती तयां लाभली
आणी त्यांसच 'लोकमान्य' जनता सारी म्हणूं लागली

देशासाठिंच हाय! सात वर्षें कारागृहीं काढलीं!
स्वातंत्र्याकरितांच हाय! लढतां त्यांनीं तनू ठेविली!!

त्यांच्या पुण्य-स्मृतीमुळें झळकते नेत्रांत बाष्पांजली
त्यांच्या पुण्य-स्मृतीवरी विखुरली ही गोड पुष्पांजली

## देवाचिये द्वारीं ! : : ४

[ अभंग ]

देवाचिये द्वारीं उभा क्षणभरी
नजर गहिरी रोंखूनिया ॥

हात जोडियेले नयन मीटले
आणि मग हाले तेथोनीया ॥

हळूच पायांत वहाणा घालोनी
त्वरेनें निघोनी चाललासे ॥

* *

अनवाणी होता येतांना बिचारा
देवावरी सारा भार त्याचा !

## काव्य : : ५

### कासार!!

लोकांसमक्ष धरितो युवतीकरांस
लावी तयांसच कृतघ्न रडावयास !
त्याही परन्तु तयासच बोलवीती,
हा ! हाय ! हाय ! जगतांत अशीच नीति ! !

## गुलाबीच कोडें ! !   : : १

—आणि वर्षं सोळाच त्या जिवाला
रम्य कलिका शोभते गोड बाला !

अशी बसते रोज ही गावयाला !
आणि सारंगी मंजूळ छेडण्याला ! !

चला वाचक हलकेच सर्व आंत
पहा आतांही गातसे गोड गीत

काय म्हणतां,.....................
........गाल कां लाल झाले ?

असें डोकें भडकलें वाचकांचें
म्हणुनि तुटती तारेच कल्पनेचे !

*  *  *

कांच होती तांबडी झरोक्याला
किरण गालीं होता तिथून आला ! !

## एकाद्याचें नशीब ! : : ७

कोणी बॅट गरागरा फिरवितो, अन् 'सेंचरी' मारतो
धांपा टाकुनि, धावुनी कुणि कधीं पन्नासही धांवतो
कोणाची परि दैव थोर म्हणुनी 'एकांत' तृप्ती असे
एकादा फुटकें नशीब म्हणुनी 'झीरो'वरी जातसे!

शेतामाजिं खपे कुणी धरुनियां हातामधें नांगर
कष्टें राबवुनी शरीर, हंसुनी तो खातसे भाकर
डोळे फोडुनि, रात्रिं जागुनि, कुणी तत्वें बडीं घोकतो
अन् पदव्या फुटकें नशीब म्हणुनी, तो दीन गुंडाळतो !

कोणी घेउनिया सखी, फिरतसे ऐटींत गांवांतुनी
कोणी पत्र गुलाबि रोज लिहितो प्रेमामधें रंगुनी
कोणी गज्जल गाउनी रिझवितो प्रेमें प्रियेला, परी
एकादा फुटकें नशीब म्हणुनी. हा ! ब्रह्मचर्या वरी !

एकादा धडकें नशीब म्हणुनी स्वर्गामधें जातसे
एकादा फुटकें नशीब म्हणुनी येथें 'कवी' होतसे !

## मोत्यांचा कारखाना : : ८

काळोखींच्या रात्रीं दिसत। नभांतरीं शोभा खुलत।
तारकांचा खेळ चालत। जणो झालर मोत्यांची ॥

पाऊस पडतां मेघांमधुनी। रविकिरणें जल चकाकुनी।
टप् टप् पडतां बिन्दू वरुनी। मौक्तिकमाला भासती ॥

दंव पडतां पर्णावरतीं। जलबिन्दू तिथें सांठती।
खरोखर दिसती प्रभातीं। जणो सडा मोतियांचा ॥

जोंधळ्यांचीं शेतें आलीं। कणसें वाढुनी पक्व जाहलीं।
रानें ज्यानें भरुनी गेलीं। दिसती तेथें मौक्तिक ॥

किंवा कूपांमध्यें कोठें। अमर्याद जल जिथें सांठे।
उपल टाकितां वेगें तेथें। बृहन्मोत्यें दिसतील ॥

किंवा लाडकी हंसतां। मुखकमल तैं विकसतां।
लाडक्याला तिकडे बघतां। मौक्तिक पंक्ती दिसतील ॥

किंवा लाडका बाब्या रडतां। किंवा ललना स्वैंपाक करितां।
दृष्टिफेंक तिथें करतां। मौक्तिक-ओढा दिसेल ॥

किंवा 'सोन्या' आपुला फर्डा। लिहितां अभ्यासाचा खर्डा।
दिसेल तेथें एकच भर्डा। सुंदर मोत्यांचा ॥

## गोपाळ कृष्ण गोखले : : १

ज्यानें देह खरोखरी झिजविला देशास तारावया
ज्याचें एकच ध्येय कीं झगडणें स्वातंत्र्य-लाभास्तव
नाहीं काळ तसाच वेळ म्हणुनी त्यानें कधीं पाहिला
त्याचें एकच कार्य कीं झगडणें स्वातंत्र्य-लाभास्तव

देशाचें निज वेड एक असलें रात्रंदिनीं लागलें
देशोद्धार करावयास म्हणुनी संस्था किती स्थापिल्या
होताही गणिती, प्रभुत्वहि असे त्या आंग्लभाषेवरी
'राष्ट्रोद्धारक' एक हीच पदवी त्याला खरी साजते !

विद्वत्ता सगळी खरोखरि असे त्याच्यांत सामावली
आहे एकच तोच धन्य पहिला या 'भारतीं सेवक'
त्यानें प्राण दिले अखेर लढतां देशास तारावया
आतां एक सुपुत्र थोर म्हणुनी कीर्ती जगीं राहिल

ऐसा एकच जन्मला, इतर ते सारे फुके जन्मले
राष्ट्रोद्धारक एक तोच अवघा होता खरा गोखले !!

## गाढव : : १०

असे मूर्ती गंभीर गाढवाची
ऐट नाहीं कसलीच या जिवाची
दु:ख आणि सौख्यही सारखेंच
नाहिं याला ठाऊकी डावपेंच !

कुणी फटके जोरांत मारतात
कुणी ओझें पाठींस लादतात
कान केव्हां रागांत ओढतात
उकिरड्यावर नेवोनि बांधतात !

संकटांशीं सारखा झुंज देसी
लोक-सेवा सारखी चालवीसी
मूर्त बघुनी गाढवा ! तव प्रशान्त
नम्रतेनें जोडितों मीहि हस्त !

जगीं 'गाढव' मूर्खास बोलतात
गाढवाचा उपमर्द असे यांत

## सुट्टी संपली : : ११

"खेळ सर्व संपले........शाळेला जाणें आलें !
चल रे दादा आतां पुण्याला
शाळेमध्यें शिकावयाला
काय लागसी रडावयाला
तूं तर भागूबाई........मी बघ थाटानें जाई !

बग्गी घेउनि येई चांगली
घोडी जोडूं तीस थोरली
ऐटिंत जाऊं पुण्यास सगळीं
चल करी घाई........गाडी वा चुकुनी जाई !

*       *       *

बग्गी दारामध्यें येतां
टापां तसल्या कानीं पडतां
त्रेधा झाली त्यांची रडतां
घर सोडुनि जाणें........जिवावर त्यांच्या हें आलें !!

## ' पडेल उमेदवार ' : : १२

नको सांपडूं मोहजालांत आतां
अरे मन्न ! ही मागणी एक आतां

१

मना सज्जना, काय रे भूल झाली
म्हणोनी 'उभा राहिलों' ऐन वेळीं
क्षणीं भोंवतीं मित्र धांवोनि आले
लफंडाव सारे अहा ! चालु झाले

२

करीं घेऊनी 'याद' मी हिंडलों ना
'मता'साठिं रे याचना सर्व नाना
सकाळीं, दुपारीं, आणी सांजकाळीं
किती कष्ट हे हाय माझे कपाळीं

३

कुणा मारिल्या ऐटिनें गोड थापा
मला वाटलें मार्ग कीं हाच सोपा
कुठें तालमीला, कुणाच्या क़बाला
किती वर्गण्या रात्रिच्या पोंचवील्या !

४

जयां ऐन रस्त्यांतहि ठोंकरावें
तयां वंदिलें, हाय, म्यां नम्रभावें
जयाशीं कधीं शब्दही बोललों ना
किती आर्जवें आळवीलें तयांना

५

प्रतिस्पर्धि मारावया कारवाया
किती योजिल्या हाय ! गेल्याच वाया
चहा, चीवडा, जाहिराती अनेक
अरे मन्न ! तें जाहलें फोल देख

६

मना दुर्जना ! काय त्वां मोहवीलें
'डिपॉझिट' ही शेवटीं ना मिळालें
नको सांपडूं मोहजालांत आतां
अरे मन्न ! ही मागणी एक आतां

## आतां काय त्याचें ? : : १३

कुठें चौघडा आजला गर्जणारा ?
यशाचे पवाडे मुखें बोलणारा ?
कुठें आजला राहिलें हो निशाण ?
कुठें लोपले आपले मानपान ?

कुठें बैसला राज्य-कर्ता शिवाजी ?
असे झोंपला आजला शूर बाजी ?
जिनें त्रस्त केलें परां ती भवानी
निकामी असे, लोपलें मूळ पाणी !

अतां मावळे ते खरे स्वामिभक्त
जयें म्लेंच्छ केले किती एक फस्त,
बघाया तरी लाभणें ते कुठून ?
असे याहुनी अन्य तें काय दैन्य ?

* * *

जुन्या वैभवाचे खरे गोड अश्रू
अतां लोपले; राहिले दीन अश्रू !
जुनें तें जुनें राहिलें काय त्याचें !
असो तें, परन्तु अतां काय त्याचें !

## तेव्हां आणि आतां ! : : १४

### तेव्हां—

तेव्हां तूं सखये! सुहास्यवदनें आनंदवीलें मला
तेव्हां होतिस तूं अहा, प्रियतमे, आकाशिंची तारका
तेव्हां नाचत गान गात फिरलों बागेंतुनी आपल्या
तेव्हांचें मधु—गूढ गुञ्जन, जणूं स्वर्गांतलें अमृत

* * *

### —आणि आतां !!

पोरें दंगल माजवूनि, सगळा कल्लोळ गे मांडिती
आतां हास्य तुझ्या मुखावरि सये, शोधावया लागतें
झाली बाग उजाड, गान विरलें, अन् लोपली तारका
होती कोंवळि कांकडी, परि आतां झाला कडू भोंपळा !

## मधुकरी : : १५

वरुनि पडतो पाऊस मुसळधार
चिखल मार्गी त्यांतूनि होत फार
गार वाराही झोंबतो जिवाला
तरी पर्वा नाहीं मुळीं तयाला !

करीं झोळी घेऊनि लगबगीनें
घरें धुंडाळी सारखा त्वरेनें
घरीं त्याच्या आहेत जीव चार
पोसणारा त्यां हाच एक थोर !

भवति भिक्षां देहीति मंत्र त्याचा
घांस त्यानें पोटास मिळायाचा
जरी भीती वाटेल पावसाची
तरी भ्रान्ती राहील खावयाची !

दुःख ज्याच्या सारखें सोबतीला
त्यास भीती वाटेल तरि कशाला ?

## आशिलांस— : : १६

१

जशी देशभक्तां हवी गांधि-टोपी
तृषार्तास वा लागते गोड वापी
जसे लागती अश्व-पायांस नाल
वकीलांसही लागताती अशील !

२

सदा सर्वदा योग तूझा घडावा
तुझे कारणीं देह माझा पडावा
उपेक्षूं नको गूणवन्ता अशीला
तुझ्या रे शिरीं सर्व माझा हवाला !

३

अहा नित्य चाले तुझी सर्व घाई
सदा भोंवतीं साक्षिदारांस घेई
तयांच्या मुखें वेद तूं बोलवीसी
तुझी ती लिला वर्णु मी दीन कैशी !

४

डफाचेवरी वाजते जेंवि थाप
तसी मारिसी रोज तूं गोड थाप

तुझा 'भाउ' 'काका' कुणी ना कुणी तो
पहा 'फी' सदा मागुनी आणितो तो !

५

तुझी 'केस' होतां पहा सर्व गांव
सदा गातसे रोज माझेंच नांव
अशी भूल तूं पाडिसी मन्मनाला
नमस्कार माझा, थोर ऐशा अशीला !

६

तुझ्यावांचुनी व्यर्थ रे कोर्ट सारें
तुझ्यावांचुनी व्यर्थ आयुष्य सारें
नवे काढ शोधोनि तूं रोज दावे
अशीला ! तुला वंदितों नम्रभावें !!

## गणपति-विसर्जन : : १७

गणराज चालला हाय! काय परतोनी
मन सुन्न होतसे, येत गळा दाटोनी
ते मोदक आणि प्रसादही चमचमित
हा, हाय! कोठुनी आतां होइल प्राप्त!

अन् फंड जमवुनी मौज कोण करणार!
जागुनी रात्रभर, कोण सांग फिरणार!
त्या बाल-बालिका कोण अतां जमवील!
अन् 'मेळा' त्यांचा कोण अतां काढील!

दर चौकामध्यें, सगळा हलकल्लोळ—
हा, हाय! शिव-सुता, कोण अतां उडवील!
कुणि भाविक तरुणी, दर्शनास तव येतां
खोकला त्या क्षणीं, येइल कवणा आतां!

सोडुनी वीर-रस, श्रृंगाराचीं कवनें
श्रीगजानना तीं आतां कोणी गाणें!

*　　*　　*

वाटतें सारखें 'मोदक' खात बसावें
विनवणी म्हणुनि कीं, दर महिन्याला यावें!

मंगलमूर्ति मोरया—

## मंगलाष्टक : : १८

नाना कष्ट करोनि शोधुनि स्थळें वेडापिसा जाहला
जोडे फाडुनि पायपीट करुनी चोंहीकडे भागला
सारा गर्व लयास जाउनि असें हें कोंकरूं जाहलें
नाहीं कांहिं इलाज हाय! म्हणुनी त्यानें तुला गांठलें ॥ १ ॥

मित्रा एक तुझा असे बसविला डोळा, नसे तो खरा
डोळेझांक करोनि सर्व बसले, वस्ताद तूं रे खरा
नाहीं गूण तुझ्यांत एकहि सख्या, वर्णूं तरी काय मी
तें कांहींहि असो, परी प्रभुवरा, कुर्यात् सदा मंगलम् ॥ २ ॥

आहे ती तिरळी जरा, परि असे दृष्टी तिची चांगली
नाकाची कलिका अहा उमलुनी ऐटींत फेंदारली
येती दांत जरा पुढें, प्रियतमा आहे जरी सांवळी
हुंड्यानें अणिली कळा क्षणिं तिला, कुर्यात् सदा मंगलम् ॥ ३ ॥

विद्वद्रत्न गुणी कलानिपुणही येथें पहा लोटले
दारीं तोरण पाहुनी सकलही येथें जमा जाहले
वाद्यें कर्कश गर्जती, कुणि मुलें त्यांतूनि केंकाटती
सारी दंगल माजली, प्रभुवरा कुर्यात् सदा मंगलम् ॥ ४ ॥

'बी. ए.' ही पदवी किती झिजवुनी काया, तुला लाभली
आधारावर त्याच आज तुजला रे मान्यता लाभली

अन् त्वां दोन हजार रोख टिचुनी हुंडा असे मारला
आतां घेइ सुखांत चैन करुनी, कुर्यात् सदा मंगलम् ॥ ५ ॥

ओढीं खूप विड्या, पहा नवनव्या 'टॉकीज' तूं रात्रिला
विश्वाची क्षणही गड्या, न करि तूं पर्वा मुळीं आजला
शेजारीं तव लाडकी कर उभी, घेई छबी छापुनी
—फोटोग्राफर आणुनी प्रथम तूं, कुर्यात् सदा मंगलम् ॥ ६ ॥

—आकाशांतिल चांद तूं, तव प्रिया रे रोहिणी हांसरी
तूं बाजा बदसूर ती परि असे मंजूळशी बांसरी
ती खेळांतिल बाहुली, असासि तूं पत्त्यांतला 'जोकर'
जोडा हा विधिनें अहा ! जमविला, कुर्यात् सदा मंगलम् ॥ ७ ॥

* * *

तूं बी. ए. परि नाहिं कोणि तुजला देणार रे नौकरी
तूं बी. ए. परि नाहिं कोणि तुजला देणार ही भाकरी
येतां संकट जाति सोडुनि पहा सारे सगे सोयरे
मित्रा, तूं सवडीनुसार स्मर हें—कुर्यात् सदा मंगलम् ॥ ८ ॥

॥ शुभ मंगल सावधान ॥

## पुण्याची पर्वती : : १९

पर्वती । इला बोलती । सांगणें आलें !
कीं नशिबाचे ते धागे तडतड तुटले ! १

हें तळें । शुष्क जाहलें । सांगणें आलें !
कीं पाणी त्यांतिल आज नाहिंसें झालें ! २

तेथची । जुन्या काळची । मौज नवलाची
कल्पनेस तरि ती कळावयाला कुठची ! ३

भेसूर । येथला नूर । दुखवि हृदयाला
अन् स्वातंत्र्याचा कळस हरपुनी गेला ! ४

बावरे । चित्त हें खरें । अश्रु ढांसळती
आजला एकटें रडणें उरलें हातीं ! ५

## ताजमहाल आणि उंदीर ! : : २०

सारी शिल्पकला जिथें प्रगटली, सौंदर्य सामावलें
प्रेमाचें जगतामधील तसलें तें एकलें स्मारक
ज्याचें वर्णन-गीत गोड अजुनी नाहीं पुरें जाहलें
ऐसा ताजमहाल भव्य बघुनी होते मती कुंठित !
त्याच्याही वरती कुणी टणूटणा मारी उड्या उंदिर
वाटे त्यास जणों असे उभविलें त्यासाठिं हें मंदिर
येवोनी रखवालदार, हणिली काठी तयाचे शिरीं
गेला प्राण क्षणांत आणि सरलें आयुष्य तें नाजुक !
कोठें ताजमहाल आणि कुठला उंदीर त्यातें घुसे
'ज्याचें त्यासच योग्य' न्याय बरवा विश्वांत साऱ्या दिसे !

## हा वसंत आला पण— : : २१

नव कळ्या गुलाबी कोठें आतां गेल्या ?
तीं पुष्पें सगळीं गेलीं कां विलयाला ?
हा असा उकाडा झाला कां पानांचा ?
तो खेळ मजेचा सरला कां वेलींचा ?
हां ! कळलें, हे भाऊचे सवंगडी
तो जातां, गेले कीं देवाघरीं
ते कसे परतणें आतां भूवरी !
ही मित्र-मंडळी, फुलें गुलाबी वेली
जाऊन सर्वही असती वरतीं बसलीं !

* * *

परि वसंत बहरुनि येतां पुष्पें फुललीं
मग झाडांवरतीं पानें कोमल फुटलीं
मग नव्या दमानें लागे वेल डुलाया
मधु मधुर रवानें लागे कोकिळ गाया
" हे देवाघरुनी आले खालतीं
परि नाहिं आणला भाऊ सोबती ! "
हें बोलुनि सहसा अश्रू उसळती
त्या मुक्या मनाची समजुत कोणीं करणें ?
त्या कळी जिवाची आतां कुठुनी फुलणें ?

## वकील : : २२

दृष्टी साफ, तरी असे चढविली नाकावरी चाळशी
आणी लाल सुरेख एक पगडी डोक्यावरी ठेविली

काळा कोट खुले, जणों रुळतसे अंगावरी झूल ती
ठेवी 'पेन' खिशामधें, जरि नसे शाई तया अंतरीं !

केव्हां धोतर पायघोळ उडतें वाऱ्यावरी नाचऱ्या
केव्हां शोभवि पाटलूण पिंवळी, जी मूळची पांढरी

पायीं कर्कर् बूट वाजत असे, चाले रुबाबामधें
बोले कांहिं तरी परी न उमगे त्याचें तयाला कधीं !

हातीं बॅग परंतु हाय ! असते ती अंतरीं मोकळी
अन् खांदे उडवी, असे नजरही चौफेर 'काका'परी

किंचित् हांसुनि, मानही तुकवुनी कोर्टा नमस्कारितो
ऐटीनें भंवतीं बघोनि, पुढल्या खुर्चीवरी बैसतो !

बर्फावांचुनि हाय ! फोल ठरते 'व्हिस्की' जशी माधुरी
हाही सर्व रुबाब फोल ठरतो त्या पक्षकाराविना !!

## नाम्याची आई ! : : २३

हाय ! भोंगा वाजला तो कठोर
क्षणीं लोटे नयनांत अश्रुपूर !
' घोंगडीवर पोर तें हो अजारी '
दृश्य आईचें हृदय तें विदारी !
परी दुसरें करणार तरी काय ?
जगीं पोटाचा सर्व खेळ होय.
जरी कामावर जाणार माय नाहीं
दुधाचाही बाळास थेंब नाहीं !
अश्रु गिळिले दु:खांत आंवरून
पदर घेई फाटका सांवरून
दार टाकी लोटून झोपड्याचें
असें जीवित रोजचें गरीबांचें !

* * *

आणि बारा वाजले घड्याळांत
तोंच गिरणी जाहली जरा शान्त !
माय आली धांवून झोपड्यांत
दृश्य होतें मेसूर हाय ! आंत !
एक झाला कल्लोळ त्या जिवाचा
जीव झाला बेभान माउलीचा
' अरे नाम्या, काय रे आज झालें ! '
बोल भंवतीं नादून सर्व गेले !!

## आणखी काय हवें ? : : २४

गार हरळी वाऱ्यांत नाचणारी
फुलें भंवतीं प्रेमांत हांसणारीं
हिरा आकाशीं बेभान धांवणारा
नवळ ओढा डोळांत वाहणारा
वेल पायीं येऊन लोळणारी
येत कानीं कोकिलेची लकेरी
मधें झिम् झिम् थोडीशि पावसाची
मुकी बडबड अज्ञान पांखरांची
असें वैभव लाभेल जर अम्हांला
हवा विश्वाचा व्याप तर कशाला !

## अस्तप्राय निशाण ! : : २५

उंच मान करून
फडफडतें हेंच निशाण !

बुरुजावरच्या काठीवरती
स्वातंत्र्याच्या वाऱ्यावरती
माना भंवतीं किती वांकती
ऐट अशी ठेवून
फडफडतें हेंच निशाण !

दृष्टिस पडतें किती लांबुनी
हृदय जातसे क्षणीं हरपुनी
मान लवतसे नम्र होउनी
झोंक नोंक राखून
फडफडतें हेंच निशाण !

* * *

आतां कुठुनी दिसावयाचें ?
आतां कोठें फडकायाचें ?
नच वाऱ्यावर नाचायाचें ?
अतां जाइ संपून
तो पहिला तसला मान !!

## वळू ! : : २६

जेव्हां शिंगें सहज अपुलीं रोंखुनी धांवतोसी
टीकाकारापरि सबल तूं लांबुनी भासतोसी !

सैरावैरा पळसि सुद्दा ! शेंपटी उंचवोनी
वाटे कोणी कवि-जन स्फुरे, हांसुनी, बागडोनी

शेतामाजीं कितिक खपसी लोक-सेवा कराया
स्वार्थत्यागी तुजसम कुणी अन्य ना भूतलीं या

केव्हां केव्हां तुजसि वरुनी मारताती प्रतोद
बैला ! त्याचा तुज नच कधीं वाटला रे विषाद !

मोठे मोठे स्तविति तुजला राजदरबारिं लोक
छायाचित्रें बघ चहुंकडे छापताती अनेक

वेड्या, आतां हळुच पदवी टाकुनी घे खिशांत
संधी ऐशी पुनरपि कधीं नाहिं होणार प्राप्त !

त्वां 'बैलोबा' म्हणुनि हंसले लोक जे संभ्रमांत
आतां सारे सहज ठरले बैल ते या जगांत !

## वा रे बंड्या : : २७

चालः—मार भरारी

शाळेजवळी........बंड्याची स्वारी आली !
  टोपी तिरपी डोक्यावरतीं
  शेंडी उडते वाऱ्यावरतीं
  मधें पुस्तकें खालीं गळती
अंगावरती........धूळही उडाली होती !
  हंसती कांहीं त्याला पोरें
  बघती त्याच्याकडेच सारे
  " वाः बंड्याजी ! वाहवा ! रे "
बोलुन ऐसें........खिजविण्या जाहले सरसे
  कारण कांहीं परी कळेना
  बंड्याजीला तें उमगेना
  डोळ्यांनाही मुळीं दिसेना
वा रे बंड्या !........तूं खरोखरीचा गुंड्या !
  विजार होती सैल जाहली
  सोवळि लंगोटी फडफडली
  वहाण एकच पायीं आली
कानांवरतीं........जानवीं टांगलीं होतीं.

## शंकर आणि नन्दी ! : : २८

[ पुराणांत न सांगितलेली गोष्ट ]

ऐटींत बसुनी नन्दीवरतीं
शंकर कैलासावर फिरती
जरी जाहली मंद चाल ती
त्रिशूळ मागुनि हळुच टोंचिती !
एके दिवशीं फार भयंकर
प्रसंग आला हा ! नंदीवर
पार्वती-पती नन्दीवरतीं
ठाण मांडुनी अहा, बैसती !
'प्रसाद' पिउनी जास्त रात्रिला
नन्दी होता तर्र जाहला
कैलासाचे नाथ त्यामुळें
पाठीवरुनी खालीं आले !
पार्वति-माई प्रकार बघुनी
असला, हंसल्या मनापासुनी
महादेव मग गरम जाहले
शाप त्या क्षणीं देते झाले
"मूर्खा, पृथ्वीवरतीं जाशिल
तिथें पुढारी म्हणवुनि घेशिल
सारे तुजला दे. भ. म्हणतिल
शिंगें रोखुनि उड्या मारशिल ।

## राज—संन्यास ! : : २९

[ प. पू. राजे आठवे एडवर्ड यांनीं प्रेमासाठीं केलेला अपूर्व स्वार्थत्याग प्रेमाच्या इतिहासांत अजरामर होईल खास ! ]

प्रेम कोणीही करेना
कां अशी फिर्याद खोटी !
सूर्य जेथें मावळेना
लाभलें साम्राज्य ऐसें
होम त्याचा पेटवोनी
गोड ऐसें कोण हांसे ?
आप्त-बंधू-मित्र सारे
जन्मभूमी प्यार अपुली
सोडुनी धांवोनि गेला
प्रीत वेडी रम्य असली !
राज-दंडा ठेवि खालीं
प्रेम-वेडा जीत झाला
अन्य कांहींही सुचेना
त्यागिलें सिंहासनाला !
प्रेम-की बन्सी बजाये
स्वार्थ सारा जाळुनीया
प्रेम-राणा आज गेला
सार्वभौमा त्यागुनीया !

प्रेम  प्यारें हो प्रभावीं
कीर्त त्याची फार मोठी
प्रेम कोणीही करेना
    कां अशी फिर्याद खोटी ?

## साभार परत ! : : ३०

व्याघ्र, हत्ती मारीन खांकुटीला
नाहिं भ्यायाचा केव्हांच यमाजीला !
नाहिं भीती पोलीस शिपायाची
नाहिं भीती प्रत्यक्ष मत्पित्याची !

*     *     *

परी दिसतां लांबून, पोस्टवाला
भरे धडकी, कांपरें ये जिवाला
हाय ! वाटे कीं, होवोनि नापसंत
'लेख' आला बैसोनि पाकिटांत ! !

## नच कळे! : : ३१

चंद्र, तारका-माणिक, मात्यें उंचावरती कां असती ?
कारणें नच गवसती ।

सुंदर पक्षी, झाडांवरती, रानामध्यें कां उडती ?
उत्तर ह्याचें त्यां माहिती ।

नव-पुष्पानें भरल्या वेली, वृक्षावरती कां डुलती ?
त्यांचें त्यांस माहिती ।

स्वदेश-भक्ती आवडते कां स्वदेशभक्तांप्रती ?
उत्तर ह्या तेच सांगती !

खेळांसाठीं पोरें सगळीं तयार कां राहती ?
जगदीशास माहिती ।

ओळी आणुनि चोरुनि कां नव-कवि काव्यां गुंफिती ?
त्यांचें त्यांस माहिती ।

असो कुणाचे कांहीं गोंधळ दिसावया सांवळे !
दुसऱ्यांना ते नच कळे ! !

## काव्य-संन्यास : : ३२

आधींच तो कवि, तशांतहि काव्य व्याला
अन् तो समग्र मग ग्रंथ प्रसिद्ध झाला !
प्रस्तावना कुणि बडा लिहितो तयाला
चेष्टा किती मग वदूं सुचती कवीला !

सातािहिकें भरुनियां करि मंत्र-सिद्धी
संपादकें धरुनियां करतो प्रसिद्धी
'सप्रेम भेट' म्हणुनी करि ग्रंथ-वृष्टी
वाटे तयां उभाविली नव रम्य सृष्टी !

कोठें प्रकाशक तयां प्रिय-मित्र भेटे
कानांत ऐकवि हळु कटु सत्य मोठें
'आहे छपाइ अजुनी सगळी उधार'
ग्रंथा गिऱ्हाइक असा अढळे न वीर

स्फूर्ती झणीं सु-कविची आटली क्षणांत
गठ्ठा करोनि कविता करि भस्मसात !

## ‘नशिबाचा नाच!’ : : ३२

‘जा ग मंजुळे! वळव घराला गुरें बाळ आपलीं’
आई हें प्रेमानें बोलली.

वारा वाहे फार भरारा, विजा तशा नाचती
माजला काळोखहि भोंवतीं!

परी एकली गरिब मंजुळा, जाई शेताकडे
मेघ तों आकाशीं कडकडे

* * *

दुसरे दिवशीं गांवकऱ्यांना, दृश्य दिसे भेसुर
हाय हें दैव किती निष्ठुर?

वृक्ष उन्मळुनि पडला आडवा अफाट होता किती
मंजुळा होति तयाखालतीं.

तिला उचलुनी गांवकऱ्यांनीं, नेली आईकडे
माय ती एकसारखी रडे!

चिमण्या खेड्यामधील चिमण्या ओढ्याकांठीं तिला
दिधला सोबतिला अग्निला!!

* * *

शेतामधुनी केव्हां केव्हां अजुनी येतो ध्वनी
मंजुळा गाते जणुं हांसुनी!

## ' मिशा आणि बासुंदी ' : : ३४

इकडे तोळा, तिकडे तोळा, बघ वाढल्या मिशा सान
कुरवाळुनी तयांना, मिळवितसे भोंवतीं किती मान ! ॥
कोठेंही तो जावो, होई त्याचा ' उदो उदो ' फार
ज्ञानवृद्ध म्हणोनी; सगळे करिती शिरीं स्तुती-मार ॥
एके दिवशीं कोणी बोलावी भोजनास बघ त्याला
आंकडे चढवुनि मिशिचे, ऐटीनें वीर हा तिथें गेला ॥
पंगत होती खाशी, जमलीं होतीं बडीं बडीं धेंडें
चुचकारुनी मिशांना खाई हा आपुल्या मनीं मांडे ॥
परि हाय ! वाढण्याला बासुन्दी आणिली तिथें जेव्हां
झाला गोरामोरा, खिन्न मनीं फार होइ तो तेव्हां ॥
'खाणार ही कशी मी ?' पडला त्याला खराखुरा पेंच
जन हंसले भंवतालीं, हृदयाला लागली क्षणीं खोंच ॥
उठला रागें रागें, झाला बहु लालबुंद तो वीर
धांवुनि जाउनि त्यानें केलें एका क्षणामधें क्षौर ॥

## गवळी आणि पाऊस : : ३५

जुनें पागोटें डोइवरी होतें
बंद बंडीचे फाटलेच होते
कडें चांदीचें शोभतें कराला
नांव गवळी हें साजतें तयाला !

जरी पडतो पाऊस मुसळधार
तरी चाले मौजेंत बीनघोर
एक कावड घेऊन चालतांना
पावसांतुनि पाहिला हांसतांना !

'दूध माझें वाढेल पावसानें'
असें कांहींसें बोलला मुखानें
आणि गेला मौजेंत गीत गात
जरी भिजला होताच नखशिखान्त !

दूध माझें वाढेल पावसानें !
हाच गवळ्यानें मंत्र एक गाणें ! !

## आईचें हृदय : : ३६

जात बाळ सासरीं
माउली दृष्टि तिजवरी धरी ।

वळे सारखी ती माघारीं
माउली असे उभीच दारीं
दृष्टी होती जरा बावरी
पोर चालली ‘ घरीं ’
माउली दृष्टि सारखी धरी !

डोळे अश्रूंनीं मग भरले
हृदयामध्यें कसेंच झालें
पदरीं अश्रू थोडे गळले
घाव लागला उरीं
कीं, पोर जात सासरीं !!

## ' कवी आणि चिखल ! ' : : ३७

होता एक तरूण, भांग तिरपा डोईवरी काढला
आणी त्यावरती सुरेख तिरपी टोपी खुले काश्मिरी

अंगीं ब्लेझर, फूल एक विलसे छातीवरी ऐटिंत
डोकावोनि रुमाल बाजुस जरा, ' पेना 'सवें बैसला !

होतें धोतर फार पातळ जणूं मावेल चिमटीमधें
पायीं ' शू ' चमके, बघूनि कुणिही घ्यावा तयीं चेहरा

होता चालत चालला, झिमझिमे पाऊस स्वर्गांतुनी
तों लांबून तयास एक दिसली बाला कुणी सुंदर !

होता त्यांतुनि तो कवी ! गदगदे स्फूर्तिं तयाची क्षणीं
डोळे रोंखुनि, पाउलें झपझपां टाकी, तशा गर्दिंत

तों आली वळणांवरूनि सहजीं मोटार वेगामधें
हा ! शेजारुनि आमुच्याच कविच्या गेली त्वरेनें पुढें !!

अन् सारें चिखलामधें सुकविचें सर्वांग तें रंगलें
अन् बाला हंसुनी, तशीच पुढती गेली निघोनी त्वरें !!

## जिन्यांतला निःश्वास !! : : ३८

असे ओटीवर खेळ मांडलेला
मैत्रिणी पण होत्याच तेथ आल्या
बाहुलींचें त्या लग्न आज त्यांत
दागदागीने घातलेले गळ्यांत

असे माई चिमुकली चंद्रकोर
आठ वर्षांची लाडिवाळ एक पोर
( हाय ! होतें पण लग्न जाहलेलें
बिचारीचें दुर्दैव आड आलें ! )

आणि नानानें ‘ बँड ’ वाजवीला
तोंच नवरा लग्नासही निघाला
डबा फुटका—मंजूळ वाद्य तेंच
एक काठी—भरदार अश्व तोच !

* * *

‘ पोस्टवाला ’ तितक्यांत आंत आला
तोंच ‘ नवरा ’ जागींच थंड झाला
पुढें माई घेऊन धांव आली
पत्र घेवोनी माडीवरी निघाली !

नसे कां हो भाऊ तिचा वडील ?
त्यास ना तर कोणास दाखवील ?

हातिं भाऊच्या देवोनि पत्र बाला
उभी राही टेंकोनि टेबलाला !

आणि भाऊनें पत्र फोडियेलें
नयन त्याचे तेथेंच खिळुनि गेले
दोन अश्रू खालतीं तों गळाले
हृदय त्याचें फाटूनि क्षणीं गेलें ! !

हाय ! बाला चरकली ती मनांत
हळुच येई खालती आंगणांत
मैत्रिणींना सांगूनि जावयाला
पोर गेली आईस सांगण्याला !

* * *

' आइ ! रडतो भाऊ ! ' असें म्हणाली
क्षणीं एका चमकून माय गेली
धांव घेई माडीवरी बिचारी
हाय ! दैवाचा खेळ हा विषारी !

' टाक माईचें कुंकु आतां पुसुन '
असें भाऊ बोलला कळवळून
एक हंबरडा आइनें फोडियेला
जिन्यामधुनी निःश्वास एक आला !

## ‘ पाळथ्या घड्यावर ’ : : ३९

खोटें बोलुं नको, उगीच कुठल्या रस्त्यांत हिंडू नको
टोपीही झुकवोनि बाजुस जरा तूं शीळ घालूं नको
कोणाच्या कधिं भांडणांत तुजला ओढून घेऊं नको
रात्रींच्या भलत्याच वेळिं, तनया ! बाहेर जाऊं नको

प्रातःकाळिं सदा मुला, उठबशा अन् जोर मारीत जा
त्याच्याही वरतीं भरोनि चरवी तूं दूध रे पीत जा
देवाला नमिल्याविना मुळिं कधीं तूं घांस खाऊं नको
साक्षी देउं नको तसाच कधिंही कोर्टांत जाऊं नको

तंबाखू चघळूं नको, तशि कधीं तपकीर ओढूं नको
तैशी संगत चांगली बघुनि ती केव्हांच सोडूं नको
अभ्यासा चुकवूं नको, भरभरां देई परीक्षा त्वरें
बाळा ! यांतच ध्येयपूर्ति तुजला लाभेल हें सत्य रे !

ऐसा हा उपदेश पाजुनि मुलां तो बाप संतोषला
बाळ्या हाय ! पहा अखेरिस परी काव्यें करूं लागला !!

## अखेरची आशा : : ४०

[ कोणाच्याहि मृत्यूची बातमी आल्याबरोबर एका क्षणांत
'मृत्युगीतें' प्रसवणाऱ्या कवींची क्षमा मागून ]

कुणी निंदा भरपूर मम करोत
स्तुती कोणी वाटेल ती करोत
उभारूं दे स्मारकेंही कुणाला
गिधाडेंही फाडोत शरीराला !

*   *   *

देवराया प्रार्थना या जिवाची
'नको कविता मजवरी रे कुणाची'

# रशियांतील राज्यक्रान्ति

लेखक

**पां. वा. गाडगीळ**

वाङ्मयविशारद

किंमत २॥ रुपये

प्रकाशकः—यशवंत गोपाळ जोशी

७२३ सदाशिव पुणें २.

---

श्री. गोपाळ लक्ष्मण आपटे

यांची स्वतंत्र सामाजिक कादंबरी

# सोनेरीं नागीण

किंमत १ रुपया

काशकः—यशवंत गोपाळ जोशी

७२३ सदाशिव पुणें २.